**अकोला महानगरपालिका सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र.१२ दिनांक ०४/०१/२०१७ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (१) अन्वये निलंबीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-अकोला-२०१७/प्र.क्र.४४/नवि-२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० जुलै, २०१७

**संदर्भ :-** आयुक्त,अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र.अमनपा/साप्रवी/आस्था/१७१/२०१७, दिनांक १९/०५/२०१७

**प्रस्तावना :-**

अकोला महानगरपालिका क्षेत्रामध्ये नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या १४ गावातील ग्रामरोजगार सेवकांना महानगरपालिका, सेवेत मानधन तत्वावर नेमणुक देण्याबाबत सर्व साधारण सभेचा दि.०४/०१/२०१७ रोजीचा ठराव पारित झाला असुन दि.०५/०५/२०१७ रोजी अकोला, महानगर प्रशासकीय कार्यालयास प्राप्त झाला आहे.

अकोला महानगरपालिकेचा आस्थापना खर्च शासनाने विहित केलेल्या मर्यादेपेक्षा जास्त असल्याने, प्रधान सचिव (नवि-२) यांचे अध्यक्षतेखाली दि.१४/०७/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये टप्याटप्याने मानधनावरील कर्मचारी कमी करण्याबाबत निर्देश दिले आहेत.

तसेच ग्रामपंचायत स्तरावर मग्रारोहयोचे अभिलेख व नोंदवह्या ठेवल्या जातात या कामात ग्रामसेवकांना मदत करण्यासाठी व संगणकीय माहिती इ. भरण्यासाठी मदतनीस म्हणून ग्राम रोजगार सेवकांच्या सेवा बाह्यस्थ (Outsourcing) पध्दतीने घेतल्या जातात. तसेच शासन निर्णय क्र.मग्रारो २०११/प्र.क्र.४०/रोहयो १०-अ दिनांक ०२/ मे, २०११ यामध्ये नमूद केल्यानुसार ग्राम रोजगार सेवकांची सेवा तात्पुरत्या स्वरुपाची असुन ते राज्य शासन/ जिल्हा परिषद/ पंचायत समितीचे कर्मचारी नसतील तसेच ते ग्राम पंचायतीचेही नियमित कर्मचारी नसतील असे स्पष्ट नमुद आहे. ग्राम रोजगार सेवकांची सेवा ही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना या विशिष्ठ कामाकरीता असल्याने व सदरची कामे ही महानगरपालिका अंतर्गत होत नसल्याने, ग्राम रोजगार सेवकांना मनपा सेवेत मानधन तत्वावर घेता येणार नाही. याकरिता अकोला महानगरपालिका सर्वसाधारण सभेने घेतलेला ठराव क्र.१२ दिनांक ०४/०१/२०१७ रोजीचा ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ नुसार विखंडीत करण्यात यावा, असे आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी संदर्भाधिन पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अकोला, महानगरपालिका सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र. १२ दिनांक ०४/०१/२०१७ हा प्रशासकीय बाबीच्या विरोधात असल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (१) नुसार तात्पुरता निलंबित झाल्याचे मानण्यात येत आहे.

तथापि, यावर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१(२) नुसार आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात महानगरपालिका तसेच आयुक्त, अकोला महानगरपालिका यांना अभिवेदन करण्यास संधी देण्यात येत आहे. विहीत मुदतीत अभिवेदन प्राप्त न झाल्यास, या अधिनियमातील कलम ४५१(३) नुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१०१३२८४१४०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2017.07.10 13:27:54 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.महापौर, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका,
२) आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
३) सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
४) उप सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.